20040811170570001-2402

**राज्यातील अभियांत्रिकी / तांत्रिक पदवी अभ्यासक्रमांच्या प्रवेशासाठी सन २००४-०५ करीता सामाईक प्रवेश परिक्षा (सीईटी) पध्दत लागू करण्याबाबत.**

---

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्र शिक्षण विभाग,

शासन निर्णय, क्रमांक : टीईएम-२००३/(५५१/०३)/तांशि-१

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२

दिनांक : १ जून, २००४

**संदर्भ :** १) शासनाचा समक्रमांकित दि.१६ फेब्रुवारी,२००४ चा शासन निर्णय

२) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र.१०/एडीजी/एडीएम/सीईटी/२००४/५७१, दि.२१ मे,२००४ चे पत्र.

**पार्श्वभूमी :** मा.सर्वोच्च न्यायालयाच्या ११ न्यायाधिशांच्या घटनापीठाने दि.३१.१०.२००२ रोजी टि.एम.ए.पै.फाऊंडेशन व इतर विरुध्द कर्नाटक राज्य व इतर याप्रकरणी (याचिका क्र.३१७/९२ व इतर ) व ५ न्यायाधिशांच्या खंडपीठाने दि.१४.८.२००३ रोजी दिलेल्या न्यायालयीन आदेशानुसार व्यावसायिक पदवी अभ्यासक्रमांचे प्रवेश गुणवत्तेवर व पारदर्शकतेने होण्यासाठी सन २००४-०५ पासून सामायिक प्रवेश परीक्षा (सी.ई.टी.) पध्दत अंमलात आणण्याचे निर्देश दिलेले आहेत.

मा.सर्वोच्च न्यायालयाचे सदरचे आदेश लक्षात घेऊन व दि.२१.१.२००४ व दि.२८.१.२००४ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार सन २००४-०५ पासून राज्यातील सर्व व्यावसायिक पदवी / पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमांच्या (आर्किटेक्चर /फार्मसी / हॉटेल मॅनेजमेंट ॲण्ड कॅटरींग टेक्नॉलॉजी /एम.बी.ए. / एम.एम.एस./ एम.सी.ए. ) प्रवेशासाठी सामायिक प्रवेश परीक्षा (CET) ची पध्दत अंमलात आणण्याचा निर्णय संदर्भाधीन दि.१६.२.२००४ च्या शासन निर्णयान्वये जारी करण्यात आला आहे.

२. तसेच सदर दि.१६.२.२००४ च्या शासन निर्णयातील परि.(१) नुसार अभियांत्रिकी पदवी अभ्यासक्रमाच्या प्रवेशाबाबत खालीलप्रमाणे निर्णय जारी करण्यात आला आहे:-

" अभियांत्रिकी पदवी अभ्यासक्रमासाठी सी.ई.टी. न घेता १२वीच्या गुणवत्तेनुसार प्रवेश देण्यासाठी मा.सर्वोच्च न्यायालयात अर्ज दाखल करण्यात येत आहे. या निर्णयाच्या अधीन राहून अभियांत्रिकी अभ्यासक्रमासाठी देण्यात येणारे प्रवेश संचालक, तंत्रशिक्षण यांचेमार्फत १२ वी च्या गुणवत्तेनुसार केंद्रीभूत पध्दतीने एक फेरी करण्यात येईल."

त्याप्रमाणे शासनाने अभियांत्रिकी अभ्यासक्रमाच्या प्रवेशासाठीच्या सी.ई.टी.मध्ये शिथिलता / सूट मिळण्याकरीता मा.सर्वोच्च न्यायालयात अर्ज (इंटेरियम ॲप्लीकेशन नं.२६-२७/२००४ व त्या अंतर्गत इंटेरियम ॲप्लीकेशन नं. १/०४) दाखल केलेला आहे.

परंतु मा.सर्वोच्च न्यायालयाने त्यावर अद्याप कोणताही निर्णय दिलेला नसल्याने व या संबंधीची सुनावणी जुलै पर्यन्त पुढे ढकलल्याने तसेच जून मध्ये सुरु होणारे शैक्षणिक वर्ष लक्षात घेता, मा.सर्वोच्च न्यायालयाच्या वरील परिच्छेद (१) मध्ये उल्लेखित मूळ न्यायालयीन आदेशाच्या पालनार्थ शासनाला अन्य व्यावसायिक पदवी अभ्यासक्रमांप्रमाणेच अभियांत्रिकी पदवी अभ्यासक्रमांसाठी देखील सन २००४-०५ करीता

सामायीक प्रवेश परीक्षा (सीईटी) घेण्याशिवाय अन्य पर्याय नसल्याने, अभियांत्रिकी पदवी अभ्यासक्रमाच्या प्रवेशासाठी सामायीक प्रवेश परीक्षा (सीईटी) पध्दत लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

३. वरील बाब दिनांक २४.५.२००४ व २५.५.२००४ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत मान्यतेसाठी सादर करण्यात आली होती. याप्रकरणी उचित निर्णय घेण्यासाठी / कायदेशीर सल्ल्यासाठी मंत्रिमंडळाच्या दि.२५.५.२००४ च्या बैठकीत मा.मंत्री (वि.व न्या.वि.) यांच्या अध्यक्षतेखाली मा.मंत्री व अधिकारी यांची उपसमिती नेमण्यात आली होती व या समितीने दि.२७.५.२००४ रोजी सादर केलेल्या अहवालानुसार पुढील शासन आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-** शासन या शासन निर्णयाद्वारे सन २००४-२००५ करीता राज्यातील सर्व अभियांत्रिकी महाविद्यालयातील पदवी अभ्यासक्रमाच्या प्रवेशासाठी सामायीक प्रवेश परीक्षा (सीईटी) पध्दत लागू करण्यास मान्यता देत आहे. :-

१) अभियांत्रिकी पदवी अभ्यासक्रमांचे प्रवेश राज्य स्तरीय सामाईक प्रवेश परीक्षेद्वारे (सी.ई.टी.मार्फत) करण्यात येतील.

२) मात्र सन २००४-०५ करीता सदरची परीक्षा गणित १०० मार्क, भौतिकशास्त्र ५० मार्कांची (एकूण १५० मार्क ) घेण्यात येईल. तसेच १२ वी च्या विषयांना ५० टक्के वेटेज देण्यात येईल.

३) खाजगी विनाअनुदानित संस्थांतील प्रवेश राज्य स्तरीय सामाईक प्रवेश परीक्षे मार्फत अथवा राज्यातील सर्व व्यावसायिक संस्थांच्या वतीने त्यांच्या एकाच असोसिएशन मार्फत घेतलेल्या सामाईक प्रवेश परीक्षे मार्फत गुणवत्तेवर करण्यात यावेत.

४) तसेच खाजगी विना अनुदानित संस्थांना संदर्भाधीन शासन निर्णयाद्वारे लागू केलेला या अभ्यासक्रमासाठीचा व्यवस्थापन कोटा मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्देशाप्रमाणे राज्य स्तरीय सामाईक प्रवेश परिक्षेद्वारे अथवा राज्यातील सर्व व्यावसायिक संस्थांच्या वतीने त्यांच्या एकाच असोसिएशन मार्फत घेतलेल्या सामाईक प्रवेश परिक्षेद्वारे भरण्यात यावा.

५) अन्य बाबी दिनांक १६.२.२००४ च्या शासन निर्णयानुसार लागू राहतील.

वरील सर्व प्रवेश गुणवत्तेनुसार व पारदर्शकपणे करण्यात यावेत.

**सदर शासन निर्णय मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या व सध्या न्याय प्रविष्ट असलेल्या आय.ए.नं.२६-२७/२००४ व त्या अंतर्गत दाखल आय.ए.नं.१/०४ च्या निर्णयाच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.**

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( श्या.र.चौरे )

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा.कुलपती तथा राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.मंत्री, तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री, उच्च शिक्षण यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव
मा.मुख्य सचिव, यांचे स्वियं सहाय्यक
प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण यांचे स्वीय सहाय्यक
संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक ( व्यवसाय शिक्षण ) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
संचालक (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
संचालक, कला, महाराष्ट्र राज्य, मुंबई
संचालक, ग्रंथालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सहसंचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालय, मुंबई /पुणे / नागपूर / औरंगाबाद / अमरावती / नाशिक
कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे
सर्व संस्थांना संचालक, तंत्रशिक्षण यांचे मार्फत.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
उच्च व तंत्रशिक्षण विभागातील सर्व कार्यासने
निवडनस्ती (तांशि-१)